# प्रस्तावना

" पुढें गेले त्यांचे शोधीत मारग ।
चला जाऊ माग घेत आम्ही ॥ "

ईश्वराची प्राप्ती करून घेण्याचा प्रयत्न करून त्याला अवश्य तें साधन करून, ज्यांनीं ईश्वराचा साक्षात्कार करून घेतला, व मानवी जीवनाचें हें एकमेव ध्येय साधून सार्थकता मिळविली, अशा अनेक पुरुषांच्या वचनांच्या व जीवनवृत्तांताच्या कथांच्या रूपानें त्या साधन मार्गावर त्यांचीं उमटलेलीं पाउलें आपणाला सापडतात, व त्यांचा माग घेतच प्रत्येक साधकाला ईश्वर-प्राप्तीचा मार्ग आक्रमावयाचा असतो; यामुळें, साक्षात्कारी पुरुषांच्या वचनांला अत्यंत महत्व आलें आहे, तें योग्यच आहे. त्यांच्या लिखाणाचें संशोधन व प्रकाशन करणें, विश्वसनीय परंपरेनें त्यांनीं तोंडानें सांगितलेलें ज्ञान तोंडींच आजपर्यंत मिळालें असलें, तर तें लिहून काढून राखणें, या गोष्टी परमार्थाच्या दृष्टीनें फार महत्वाच्या आहेत. साक्षात्कारशास्त्र अद्याप पुष्कळ वाढलेलें नाहीं व वर सांगितल्याप्रमाणें अनेक साक्षात्कारी पुरुषांच्या वचनांची भर पडून तें जितकें वाढेल तितकी परमार्थाचे वाढीला, म्हणजे मानवतेच्या

खऱ्या विकासाला, मदत होईल. याद्दष्टीनें आपल्या अहमदाबाद येथील व्याख्यानांत प्रा रा. द. रानडे, एम्. ए; डी. लिट्. सेवानिवृत्त व्हाईस-चॅन्सेलर, अलाहाबाद विश्वविद्यालय, यांनीं सांगितलें होतें कीं, मानवतेंत ऐक्य उत्पन्न करणेच्या दृष्टीनें, प्रत्येक देशांतील, भाषेंतील, धर्मांतील व कालखंडांतील सत्पुरुषांच्या वचनांचा संग्रह करून त्यांचें संशोधन केलें पाहिजे; म्हणजे त्यांत विखुरलेल्या आत्मसाक्षात्काराच्या अनुभवांतून साक्षात्काराचें पूर्ण शास्त्र तयार करतां येईल व तें धर्म, काल, तत्वज्ञान इत्यादि भेदांच्या पलीकडे आहे हें दिसून येईल; त्याच्या प्रसारानें व साधनानें मानवतेचें ऐक्य साधतां येईल; कारण, एक देव, एक धर्म असें होईल तेव्हांच मानवता एक होईल; दुसरा मार्ग नाहीं.

साक्षात्कारी संत सर्व कालांत, देशांत, धर्मांत होऊन गेले आहेत, व त्यांच्या आत्मानुभवांत विलक्षण साम्य आहे. भारतांत तर अशा पुरुषांची परंपरा फार मोठी व प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. महाराष्ट्रांतील अनेक संत हा त्यापैकीं एक महत्वाचा भाग आहे. कोल्हापूरचे सुप्रसिद्ध श्री सिद्धेश्वर महाराज राजगुरु हे या कोटींतील एक साक्षात्कारी संत होऊन गेले. त्याची पारमार्थिक परंपरा त्यांच्या आतां विस्तार पावलेल्या कुळांत व अनेक

शिष्यकुलांत गेलीं दीडशेहे वर्षे सुरू आहे. श्रीसिद्धेश्वर महाराजांचें फारच थोडें लिखाण,–म्हणजे अवघे तीस अभंग व दहा हिंदी दोहे,–उपलब्ध आहे, तरी तें पारमार्थिक दृष्ट्या फार उच्च दर्जाचें असल्यानें, या पुस्तकाच्या रूपानें प्रसिद्ध करण्यांत येत आहे हा खरोखर सुयोग होय. या अल्प परंतु गुणकारी उपदेशामृताचा उपयोग त्यांच्या अनुयायांनाच केवळ नव्हे, तर सर्व परमार्थप्रेमी जनांना होईल यांत शंका नाहीं.

२. श्रीसिद्धेश्वर महाराजांचें जीवनचरित्र प्रकाशकांनीं आपल्या निवेदनांत दिलें आहे. तेव्हां आतां या पुस्तकांत प्रसिद्ध केलेल्या श्री सिद्धेश्वर महाराजांच्या अभंगांचा व दोह्यांचा विचार करूं. परंतु तो नीट समजण्याला परमार्थ मार्गाचें थोडें विवेचन केल्यास फार उपयुक्त होईल असें वाटल्यावरून त्याची रूपरेषा खालीं देण्यात येत आहे. कोणत्याही शास्त्रांतील लिखाणाचें योग्य मूल्यमापन त्या शास्त्राच्या मूलतत्वांच्या पार्श्वभूमिकेवरच करता येतें, म्हणून या पुस्तकांतील अभंग समजण्यास परमार्थमार्गाची पार्श्वभूमी लक्षांत घेतली पाहिजे.

पाश्चात्य तत्वज्ञानांत या शास्त्राला Rational mysticism म्हणतात. आत्मप्राप्ति, देवाचा साक्षात्कार

परमार्थ किंवा स्वरूपसाक्षात्कार असें त्याचें वर्णन करतां येईल. आपण " स्वरूपसाक्षात्कार " हें नांव त्याला देऊं. या विषयाचा, गेलीं कित्येक वर्षे पर्यंत, अत्यंत खोल, सांगोपांग, पाश्चात्य व भारतीय तत्त्वज्ञानाच्या तौलनिक दृष्टीनें अभ्यास करून, त्याप्रमाणें स्वतः साक्षात्कारमार्ग आक्रमून, अत्युच्च अपरोक्षानुभूति व आत्मप्रचीति प्राप्त करून घेऊन, प्रा. रा. द. रानडे यांनी ' उपनिषद्रहस्य ' व ' महाराष्ट्रांतील संतांचा साक्षात्कार ' हे इंग्रजी ग्रंथ लिहिले. " हिंदी परमार्थ सोपान " व " कर्नाटकांतील संतांचा साक्षात्कार " हीं पुस्तकें ते लिहीत आहेत. या सर्व पुस्तकांत या विषयाची शास्त्रीय मांडणी त्यांनीं केली आहे; त्यांचे आधारानें स्वरूपसाक्षात्काराचें पुढें थोडक्यात निवेचन केलें आहे.

स्वरूप साक्षात्काराच्या पांच पायऱ्या आहेत.

१ परमार्थप्रवृत्ति.
२ वैराग्य व चित्तशुद्धि किंवा प्राथमिक नैतिक तयारी.
३ ईश्वराचें स्वरूप, व त्याच्या व संतांच्या नात्याचें स्वरूप.
४ साधन मार्ग.
५ साक्षात्कार.

कांहीं पायऱ्याचे पोटविभाग पाडून ही पायऱ्यांची संख्या वाढविता येईल; त्यांची संख्या ठरलेली नाहीं;

त्यांत अंतर्भूत होणाऱ्या विषयांत मात्र विशेष फरक होणार नाहीं. या पांच पायऱ्यांचा आतां क्रमवार विचार करूं.

१ मानवी जीवनांतील त्रिविध दुःखें, त्यांत अनुभवाला येणारी वंचना व वैय्यर्थ्य, अनिश्चितता, क्षणभंगुरता व *चांचल्य, अपूर्णता, अज्ञान व दुर्बलता यापासून मुक्तता* व्हावी, आनंद, पूर्णता, सामर्थ्य, अभय व स्थैर्य हीं प्राप्त व्हावींत यासाठीं मनुष्याची धडपड सुरू असते. त्याचप्रमाणें अनंत विश्व व त्याचे अनंत चमत्कार यामुळें त्याची बुद्धि दिपून जाते, मन विस्मित होतें, व हें विश्वाचें कोडें कसें सुटेल, याचा कर्ता कोण असेल, याचा तो विचार करू लागतो. दुर्गुणापासून, वासनेपासून आपली मुक्तता होऊन आपण शुद्ध, शुचि असावें असें मनुष्याला वाटतें, पण वासनेची मिठी सुटत नाहीं; यामुळें तो विषण्ण होऊन त्यातून सुटण्याचा उपाय शोधूं लागतो. जगांत सदाचारी लोक दैन्यांत व दुःखांत कुचंबत पडलेले दिसतात व दुराचारी लोक वैभव व सुखविलास भोगीत असतात असें तो पाहतो व त्यामुळें त्याच्या न्यायबुद्धीला धक्का बसतो. 'हें कां व्हावें' हा त्याला प्रश्न पडून त्याचें उत्तर तो पाहूं लागतो. यापैकीं एक किंवा अनेक कारणामुळें मनुष्याची परमार्थाकडे प्रवृत्ति होते. ईश्वराच्या

प्राप्तीनें, स्वरूपसाक्षात्कारानेंच, या सर्व गोष्टींचें कोडें सुटेल, दुःख निवृत्ति होऊन, सुखप्राप्त होईल, वासनेची पकड सुटेल, या विश्वासानें व निष्ठेनें तो परमार्थाकडे वळतो. सारांश, पापाची खंडणा व्हावी, जन्मयातना चुकावी, मी कोण, देव कोण हें समजावें व विश्व कशाचें केलें आहे, त्याचा कर्ता कोण हें ओळखावें, हीं परमार्थ प्रवृत्तीचीं मुख्य कारणें होत.

ईश्वर नित्य, आनंदमय व पूर्ण आहे. त्याच्या प्राप्तीनें आनंद, पूर्णत्व, अभय मनुष्याला प्राप्त होतात, हे वाचनानें, श्रवणानें किंवा उपजत भावानें झालेले व असलेले, पण सुप्त, अस्पष्ट असल्यानें कार्यक्षम नसणारे, संस्कार थोडे फार जागृत, स्पष्ट व कार्यक्षम होणें, याचाच अर्थ परमार्थप्रवृत्ति.

२. यानंतर वैराग्य व चित्तशुद्धि ही दुसरी पायरी मनोविकासाच्या क्रमानेंच येते. प्रपंच अनेक दोषांनीं युक्त असल्यामुळें तो नको व त्या दोषांतून मुक्त अशी स्थिति, अर्थात् ईश्वरप्राप्ति किंवा आत्मप्राप्ति हवी असें बुद्धीला वाटू लागलें तरी हें बुद्धीचें ज्ञान मनांत व इंद्रियांतही मुरावें लागतें; तेव्हांच तीं बुद्धीच्या वळणानें जाऊं लागतात. बुद्धींत परमार्थप्रवृत्ति उत्पन्न झाली तरी मन व

इंद्रियें विषयप्रवृत्तच राहतात. त्यांचें विषयाकडे असलेलें वळण बुद्धीच्या परिवर्तनानें सुटत नाहीं. त्यासाठीं स्वतंत्र प्रयत्न करावा लागतो. दुर्गुण टाकून सद्गुण अंगीं आणावे लागतात. हाच स्वरूपसाक्षात्काराच्या प्रयत्नांचा पाया आहे. विषयासक्त मन ईश्वराचें चिंतनच करूं शकत नाहीं; म्हणून सर्व संतांनीं या नैतिक तयारीचें फार विस्तारानें वर्णन करून, तिचें महत्व वर्णिलें आहे. दासबोधाच्या ' सत्वगुण ', ' शिष्य ' व ' साधक ' याचें निरूपण करणाऱ्या समासांत या विषयाचें विस्तृत वर्णन आलेलें आहे. गीतेच्या तेराव्या अध्यायांत सांगितलेले ' अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षांति ' इत्यादी गुण, त्याचप्रमाणें अध्याय सोळामधील दैवी संपत्तीचें ' अभयं सत्वसंशुद्धिः ' वगैरे अनेक गुण साधकानें प्रयत्नानें अंगीं आणिले पाहिजेत. ' प्रपंच ओसरो, चित्त तुझे पायीं मुरो ' हें या प्रक्रियेचें मूल-भूत सूत्र आहे. प्रपंचाची आसक्ति ओसरत ओसरत नाहींशी व्हावी, देवाकडील ओढ वाढत वाढत चित्त तेथें अनन्य व्हावें, हें साधावयाचें असतें. त्यासाठीं कामक्रोधादिकांचा त्याग करून, वैभव तृणतुल्य मानून, दया, क्षमा, परोपकार, निरहंकृति, इत्यादि सद्गुण वाढवावे लागतात. विषयासक्त करणारी अभक्तांची संगती सोडून ईश्वरोन्मुख करणारी संतांची संगती धरणें

अवश्य असतें, सत्य, अहिंसा, धैर्य, समता, पावित्र्य इत्यादि गुण वाढवावे लागतात ही 'साक्षात्कार" मार्गावर प्रवास करण्याची नैतिक शिदोरी होय. ती तयारी करून त्या मार्गाला लागले पाहिजे.

३. या नतरची तिसरी पायरी ही या प्रवासाची शिदोरीच आहे. तिला बौद्धिक शिदोरी म्हणतां येईल. "परमार्थप्रवृत्तीचे" वेळीं ईश्वराचें ज्ञान अगदीं अस्पष्ट असतें. जीवनाचे दोषच तीव्रतेनें टोचत असतात व त्यामुळें मनुष्य देवाकडे वळतो. पुढें, जें स्थान गाठावयाचें त्याचें अधिक स्पष्ट ज्ञान करून घेणें अवश्य असतें. अर्थात् हें बौद्धिक ज्ञान होय, अनुभूति नव्हे. परंतु हें बौद्धिक ज्ञान श्रद्धा व भक्ती वाढविण्याला व आपला मार्ग न चुकता आक्रमण्याला फार उपयोगी पडतें. यासाठीं, देव आत बाहेर सर्वत्र भरलेला आहे, तो अंतर्यामी आहे, सगुण निर्गुण आहे, तो भक्तवत्सल, दीनदयाळ, पतित पावन असून, सर्वसमर्थ उदार आहे, या देवाच्या अनेक गुणांचें व षडैश्वर्यांचें श्रवण, चिंतन करून त्याचें बौद्धिक ज्ञान करून घ्यावें त्यामुळें भक्ति व भाव स्थिर व दृढ होतात. त्याचप्रमाणें, देवभक्तांचें प्रेम, त्यांचें निकट नातें, ईश्वरप्राप्तीनें भक्तांना मिळणारा आनद व सामर्थ्य, त्यांच्या ठिकाणी येणारी निर्भयता, स्थैर्य व समता यांचेंही चिंतन

भक्ति व भाव वाढविण्याला उपकारक होतें, व आपल्याला जें साध्य करावयाचें आहे त्याचें स्वरूप संतांच्या लक्षणांच्या रूपानें आपल्या बुद्धीपुढें सदा आदर्शाप्रमाणें उभें राहतें यासाठीं "ईश्वराचें स्वरूप व त्याचें व संतांचें नातें" याचा विचार येथें करावा लागतो.

४. अशा रीतीनें प्रवासाची शिदोरी तयार झाल्यानंतर, चौथ्या पायरीचा, "साधनमार्गाचा", विचार येतो. त्याला सुरवात करण्यापूर्वी, दोन व तीन या पायऱ्यांसंबंधीं एक महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती ही कीं, सद्गुणाची जोपासना, व देवाच्या आणि संतांच्या गुणांचें चिंतन, हीं साधन-मार्ग संपेपर्यंत सुरू ठेवावयाचीं असतात. या दोन गोष्टी पूर्ण झाल्यावर साधन-मार्गास सुरवात करावयाची असें नाहीं; कारण साक्षात्कार होईपर्यंत त्या पूर्ण होतच नाहींत. सद्गुणोपासना व ईश्वराच्या आणि संतांच्या गुणांचे चिंतन आणि साक्षात्कार हीं परस्परोपकारक, एकमेकांना वाढवणारीं आहेत व त्यांची वाढ अनेक पायऱ्यांनीं होत असते; म्हणून पहिल्या दोन गोष्टी कांहीं प्रमाणांत साध्य झाल्या कीं मनुष्य साधन-मार्ग आक्रमण्यास पात्र होतो. असो.

साधन मार्गाचा विचार करतांना पहिली गोष्ट

सद्गुरूची भेट व त्यांची कृपा होऊन नाममंत्र मिळणें. सद्गुरू वाचून कोणींही देव दाखवूं शकत नाहीं. अर्थात् 'जो देव दाखवितो तोच सद्गुरु' हें सद्गुरूचें लक्षण सहजच झालें. सद्गुरु हे स्वरूपसाक्षात्कारी व स्वरूपाशीं ऐक्य पावलेले असावे लागतात. अशा अधिकारी सद्गुरूच्या कडून मिळालेलें नाम सबीज असतें. त्याच्या स्मरणानें देवाचें पीक लाभतें, साक्षात्कार होतो. त्या नामांतून सद्गुरूचें दैवी सामर्थ्य शिष्याला मिळतें, व नामाचें स्मरण होत असतांना प्रत्यक्ष देवच शिष्याच्या अंतःकरणांत असतो व विस्मरणाचे वेळी देव दूर होतो असें संत सांगतात. 'आठव तो ब्रह्म । नाठव तो भवभ्रम '. यावरून अधिकारी सद्गुरूच्याकडून मिळालेल्या नामाचें अखंड स्मरण हें मुख्य साधन हें स्पष्ट होतें. एक श्वासही नामा वाचून वाया जाऊं देऊं नये असा संतांचा आदेश आहे. नामस्मरण एकाग्रतेनें होण्यासाठीं आसनावर स्थिर बसून, दर श्वासांत नाम घेत कांहीं तास नेमानें, कष्टानें स्मरण करावें. उरल्यावेळीं चालतां बोलतां त्याचें अनुसंधान ठेवावें, "करसे काम करो । हरिसे ध्यान धरो ॥" असें संत सांगतात. या साधनावरील श्रद्धा वाढवून, तें दीर्घकाल करतां येण्याला सत्संगासारखा उपाय नाहीं. हें साधन करतांना कंटाळा येतो, मन विषयाकडे धावतें, अनेक मोह आड

येतात, एकाग्रता न झाल्यामुळें निराशा वाटूं लागते; तरी या सर्व अडचणींना न जुमानतां, मन बळकट करून, विषयाच्या ओढी तोडून धैर्यानें, निष्ठेनें साधन केलें पाहिजे, तरच साक्षात्कार हें फळ प्राप्त होईल, असें संतांनीं बजावलें आहे. हा शूरांचा मार्ग आहे, भेकडांचा नाहीं. भाव अनन्य राहिला पाहिजे; देव करील तें होवो, ही शरणागतीची वृत्ति ठेविली पाहिजे. याप्रमाणें दीर्घकाळ, निरंतर, आदरानें नामस्मरण केलें म्हणजे साक्षात्कार होतो. दुसरा मार्ग नाहीं इतर मार्ग भ्रमाचे आहेत. "नान्यः पन्थाः विद्यते अयनाय।। अशीं थोरांचीं वचनें आहेत.

५ यानंतर शेवटची पाचवी पायरी म्हणजे साक्षात्कार. यांत चार गोष्टींचा विचार होतो.

१ साक्षात्काराचे प्रकार.
२ त्याचे मानासिक व बौद्धिक परिणाम.
३ त्यामुळें जग, देव व जीव याकडे पाहण्याच्या दृष्टींत होणारा बदल.
४ या सर्वांपासून आचरणाला लागणारें नवें वळण.
या चार गोष्टींचा क्रमशः विचार करूं.

१ अनाहत नाद, वर्ण किंवा रंग, रूप, तज, सुगंध रसास्वाद व स्पर्श यापैकीं एका किंवा अनेक प्रकारांनीं,

साधकाच्या योग्यतेच्या मानानें, देवाचा साक्षात्कार होतो, व तसा झाल्याचीं स्वानुभवाचीं अनेक वचनें अनेक संताचे लिखाणात सापडतात यापैकीं 'आत्मदर्शन', " तुसर्वे मुख जैसें । दर्पणीं देखिजतसे दर्शनमिसें । वायाचि देखणें ऐसें । गमों लागे ॥ ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही ही डोळस आरिसे । परस्परें पाहतां कैसें । मुकले भेदा ॥", हा चांगदेवपासष्टींत सांगितलेला अनुभव फार श्रेष्ठ आहे; व त्याच्या अनुरोधानें या शास्त्राला " स्वरूपसाक्षात्कार " हें नांव दिलें आहे. हे अनुभव इंद्रियज्ञानासारखे वाटले तरी अतींद्रिय असतात आंधळ्याला देव दिसतो, बहिऱ्याला देव ऐकूं येतो. त्यांत सातत्य असतें, नित्यत्व असतें, परमानंद असतो. त्यात Universality आहे म्हणजे योग्य मार्गानें जाणाऱ्या अनेक साधकांना हेच अनुभव येतात व त्यायोगें त्यांच्या भावना, बुद्धि व कार्यशक्ति या सर्वांत कायमची वाढ होते यावरून ह अनुभव सत्य आहेत भ्रम नव्हेत हें सिद्ध होतें भ्रमापासून अशीं प्रभावी कार्यें होऊं शकत नाहींत.

२. निरतिशय व अखंड आनंद (Bliss) हें या अनुभवाचें मुख्य लक्षण आहे व त्या आनंदांतूनच त्याचे नैतिक परिणाम उगम पावतात या आनंदान विषयाच्या

ओढी तुटतात, इंद्रियें व मन स्थिरावून शांत होतात, हळहळ, तळमळ थांबते; त्रिविध तापाचें दहन होतें; या अखंड आनंदापुढें ऋद्धिसिद्धी ही तुच्छ वाटतात, मग ऐहिक सुखाला कोण पुसतो? विषयांचा निःशेष विसर पडून, देवाबद्दल अमित प्रेम वाटून, मनुष्य धन्य, कृतार्थ होतो. देवाचा आधार असल्याची खात्री पटून, निर्भयता व सामर्थ्य येतें. दुर्बळता, पाप, ताप नष्ट होतात. लोकांचें प्रेम मिळतें. देहभाव ओस पडून तेथें हरीची वस्ती होते, फार काय, तो स्वत.च देव होतो. अशा प्रकारें साक्षात्काराच्या अद्भुत, तेजस्वी, वैभवशाली परिणामाचें संतांनीं मोठ्या उत्साहानें, कृतार्थतेनें, कांहींशा सात्विक उन्मादानें स्फूर्तिदायक वर्णन केलें आहे.

३. अशा साक्षात्कारी संतांना मीच देव, सर्व विश्व देव मीच विश्व, असा अनुभव येतो ब्रह्मात्मभाव व सर्वात्मभाव त्यांचे ठिकाणीं जागृत होतो. "देह प्रत्यक्ष झाला देव" व "विठ्ठल हें जग देखियेलें" अशी स्थिति होते. ते देवाशीं एकरूप होऊन अभेदरूपानें राहतात. हा अद्वैताचा अनुभव म्हणजे साक्षात्काराची उच्चतम पायरी होय.

४. या सर्व गोष्टींचा आचारावर परिणाम झाल्याशिवाय कसा राहील? "देवाच्या संबंधें विश्वाचि सोयरें"

झाल्यावर, आपपरभाव, सर्व द्वंद्वें, नष्ट होऊन साक्षात्कारी पुरुष विश्वबंधुत्वाच्या नात्यानें वागू लागतो, देवाच्या इच्छेनें चालतो, बोलतो, जीवभावानें मरून जाऊन, शिवभावानें उरतो, केवळ खऱ्या सुखाचा मार्ग देवाचा निरोप म्हणून जगाला सागण्यासाठीं उपकारापुरता उरतो. एरवी तो कर्मातीत होतो सर्व कांहीं त्यास शुभ, मगल होऊन जातें व "देखती जे डोळे। रूप आपलें तें खेळें ॥ आता काय उरले वाचें। पुढें शब्द बोलायचे ॥" अशी धन्यता, कृतार्थता त्यास प्राप्त होते. विस्तारभयास्तव साक्षात्कारी सताच्या कृतार्थतेच्या वैभवाचें, निरतिशय आनंदाचें व विश्वप्रेमाचें वर्णन आखडतें घेणें प्राप्त आहे. प्रस्तावनेच्या दृष्टीनें या विषयाचें वरील विवेचन लांबलेलें वाटलें तरी विषयाचे दृष्टीनें तें अगदींच त्रोटक व अपूर्ण आहे, पण त्याला इलाज नाहीं. पुढील अभगाचा व दोह्यांचा विचार समजण्याला तें पुरेसें होईल असें वाटतें,

श्रीसिद्धेश्वर महाराजाचे अभग फार थोडे असल्यामुळें "साक्षात्कार" सबंधीं सर्व विषय त्यात समाविष्ट झालेले सापडणें शक्य नाहीं. उदा० "स्वरूप साक्षात्काराच्या" पहिल्या व दुसऱ्या म्हणजे "परमार्थप्रवृत्ति" व "वैराग्य व चित्तशुद्धि" या पायऱ्यासबंधीं अभग त्यात

नाहींत. या गोष्टींचा विचार कांहीं अभंगांत सहज आला आहे, पण प्रामुख्यानें नव्हे. तिसऱ्या, "देव व संत" या पायरीपासून विवेचनास सुरुवात होते. व पुढें साधनमार्ग व साक्षात्कार यासंबंधीं सुंदर विचार त्यात पहावयास सापडतात.

सिद्धेश्वरमहाराजांचे अभंग व दोहे वाचीत असता, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, कबीर यांचीं वचनें डोळ्यापुढें येतात. परंतु विस्तारभयास्तव त्यांचीं अवतरणें देण्याचा मोह सोडला पाहिजे. महाराजांचे अभंग व दोहे उच्च दर्जाचे व थोडे; त्यामुळें त्यांचा अर्थ लावणें अवघड पडतें. पुढें दिलेल्या अभंग व दोहे यांच्या स्पष्टीकरणात चुका झालेल्या असणें अगदीं शक्य आहे. तशा असल्यास वाचकांनीं उदार मनानें क्षमा करावी. डॉ. आप्पामहाराजांनीं सिद्धेश्वरमहाराजांची सेवा करण्याची ही संधि मला दिली याबद्दल मी त्यांचा अंतःकरणपूर्वक ऋणी आहे, इतकें सांगून ही प्रस्तावना संपवितों !

१९–५–५२
शिवाजीनगर,
सांगली.

ग. वि. तुळपुळे, एम् ए,
सेवानिवृत्त डी पी एम् जी.

श्रीसद्गुरु समर्थ

# प्रकाशकाचें निवेदन.

श्रीज्ञानेश्वर एकनाथादि संत श्रेष्ठापासून पुढें अनेक शतकें जी संत मालिका या भाग्यवान् महाराष्ट्र देशांत निर्माण झाली व ज्यामुळें या देशाचें नांव अत्यंत उज्वल झालें आहे त्या संत मालिकेंतच श्रीसद्गुरु श्रीसिद्धेश्वर उर्फ श्रीबुवामहाराज राजगुरु यांचा अंतर्भाव केला पाहिजे. हिंदवी स्वराज्य संस्थापक श्रीशिवाजी महाराज यांचे ज्याप्रमाणें श्रीरामदास अगर श्रीमंत पहिले बाजीराव पेशवे यांचे श्रीब्रम्हेंद्रस्वामी त्याचप्रमाणें करवीर छत्रपती घराण्यांतील तिसरे श्रीशिवाजीराजे छत्रपती यांचे ते अध्यात्मगुरु होत व त्यामुळेंच त्यांचे घराण्यास "श्री" "महाराज" व "राजगुरु" या उपाधी तेव्हां-पासूनच प्राप्त झाल्या. त्यांचें वाङ्मय जें उपलब्ध आहे तें तुलनेनें पुष्कळ जरी नसलें तरी त्याची अध्यात्मिक पातळी फार उच्च दर्जाची आहे यांत संशय नाहीं. प्रस्तुत प्रकाशकाचे ते सहावे पिढीचे पूर्वज म्हणजे निपणजे होतात हें सोबतच्या वंशवृक्षावरून दिसून येईल. त्यांचें

वाङ्मय अद्यापपर्यंत अप्रकाशित राहणेचें मुख्य कारण म्हणजे तें फार थोडें आहे, हें असावें; पण त्याचा श्रेष्ठ दर्जा लक्षांत घेतां तें प्रकाशित करून श्रीसद्गुरु सिद्धेश्वर महाराज यांची अल्पस्वल्प सेवा घडावी, व त्यांच्या घराण्यांत जन्म मिळाल्याचें ऋण अंशतः मजकडून फिटावें व त्यांच्या कुळांतील सर्व मंडळींना, त्याचप्रमाणें त्यांच्या सांप्रदायांतील जे कोणी असतील त्यानांच केवळ नव्हे तर सर्वच लोकांना उपयोगी पडून, श्रीसिद्धेश्वरमहाराज यांनीं सुरू केलेली भक्तिपरंपरा वाढत जावी या उद्देशानें त्यांच्या वाङ्मयाचें म्हणजे त्यांनीं केलेल्या अभंगांचे व दोह्यांचें सटीक व सटीप असें प्रकाशन करणेचें योजिलें आहे. वास्तविक, त्या अभंगाची व दोह्यांची अध्यात्मिक श्रेष्ठता जाणण्या इतका माझा अधिकार नाहीं; पण माझ्या परम भाग्यानें महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विद्वान् तत्त्ववेत्ते व आत्मदर्शी संत परमपूज्य श्री. रा. द. रानडे, एम. ए., डी. लिट्. – ज्यांचा व माझा पूर्वी अनेक वर्षाचा दृढ परिचय असूनही त्यांच्या सत्सहवासाचा लाभ मला गेल्या वर्षापर्यंत घेतां आला नव्हता – यांचा सहवास गेल्या आक्टोबर १९५२ महिन्यांत मला मिळाला, त्यावेळीं या अभंगांची व दोह्यांची अध्यात्मिक थोरवी माझे नजरेस आणली गेली, व

त्यांचिचकडून हें वाङ्मय प्रकाशित करणेची प्रेरणा मला मिळाली. त्याची पूर्तता करण्याइतकी अध्यात्मिक पात्रता माझी नसल्यानें तें काम कोणा तज्ञाकडूनच व्हावयास पाहिजे होतें. सुदैवानें मी निंबाळ येथें प. पू. श्री. रा. द. रानडे यांचे सांनिध्यांत असतांनाच त्यांचे एक अत्यंत निकट वर्ति स्नेही व गुरुबंधु, " परमार्थ पथ " व " तुकारामाचा: भक्तीचा डांगोरा " या पुस्तकांचे विद्वान् कर्ते श्री. गणेश विष्णु उर्फ काकासाहेब तुळपुळे, एम्. ए. यांचेशी माझी ओळख झाली व त्याचें रूपांतर लौकरच गाढ स्नेहांत झाले व त्यांनींच सर्वस्वी मला प्रोत्साहन देऊन, हें पुस्तक तयार करून मला दिलें. तेंच हें पुस्तक मी प्रकाशित करीत आहे. या हकीगतीवरून त्यांत माझा भाग किती अल्प आहे हें कोणासही सहज दिसून येणार आहे. महाभाग श्री. रा. द. रानडे यांच्या प्रेरणेशिवाय व श्री. काकासाहेब तुळपुळे यांच्या या सक्रिय प्रोत्साहना-शिवाय हें पुस्तक तयार होणें अशक्य होतें; तें त्यांनीं करून देऊन हें वाङ्मय प्रकाशित करणेची व तद्वारा माझे थोर पूर्वज सत्पुरुषाची अल्प कां असेना पण सेवा करणेची संधी मला उपलब्ध करून दिल्याबद्दल या उभयतांचा अंतःकरणपूर्वक मी सदैव ऋणी राहीन. सदर अभंगांची श्री. काकासाहेब तुळपुळे यांचेशीं चर्चा करतांना

## श्रीसद्गुरु श्रीसिद्धेश्वरमहाराजांचें ध्यान.

---

श्रीमत्सिद्धेश्वराख्यं मुनिवरममलं सच्चिदानंदरूपम् ।
नानाविद्याविलासैर्भवजलधिगतान् सर्वदा सर्वजन्तून्॥
मंद्रानुन्मज्जयन्तं सकलबुधजनै संस्तुतं क्षेमसिद्ध्यै ।
देहातीतं वसंतं नरहरिनगरे नौमि सर्वान्तरस्थम् ॥

## श्रीसद्गुरु श्रीसिद्धेश्वर उर्फ श्रीबुवामहाराज राजगुरु यांची जरूर ती वंशावळ

श्रीसिद्धेश्वर महाराज

- १ रामचंद्र पंडित उर्फ श्रीबाबा महाराज
  - ४ श्रीकृष्ण पंडित उर्फ बापूमहाराज (यांच्या ग्रंथबद्ध चरित्राच्या आधारे मी श्रीचे चरित्र लिहिले)
  - ५ श्रीआबामहाराज (संतकवी विठोबाअण्णा दप्तरदार कऱ्हाडकरांचे अध्यात्मिक गुरु)
- २ श्रीनारायण पंडित उर्फ श्रीनाना महाराज
- ३ श्रीवासुदेव पंडित उर्फ श्रीभाऊ महाराज
  - ६ श्रीदादामहाराज
    - ७ श्रीबाळामहाराज
      - ८ श्रीनानामहाराज
        - ९ श्रीकृष्ण पंडित उर्फ श्रीआप्पा महाराज (प्रस्तुत पुस्तकाचा प्रकाशक)

# श्रीसिद्धेश्वर महाराजाचें चरित्र

महाराजांचे वडील, श्रीरामचद्रभट देव जोशी हे वेरूळच्या उत्तरेस द्वादश ज्योतिर्लिंगापैकीं श्रीघृष्णेश्वर क्षेत्रापासून १२ कोसावर असलेल्या निधोन बावरे नावाच्या खेड्यात रहात असत. त्यांचेकडे, बावरे व त्याच्या आसपासच्या बारा खेड्याच्या जोशीपणाची वृत्ति होती. श्रीरामचद्रभट याच्या पत्नीचें नांव श्री सौ गोदावरी. रामचद्रभटजी व त्याच्या पत्नी या उभयतानीं कुळाच्या वृद्धीसाठीं कुलदैवत श्रीभैरवनाथाची भक्ति व तपश्चर्या केली, तेव्हा कानफाट्या गोसाव्याच्या रूपानें श्रीभैरवनाथानीं त्याना दर्शन दिलें व "तुमच्या भक्तीनें आम्ही सतुष्ट झालों आहों व तुमच्या पोटीं जन्म घेऊ, आमचें नाव 'सिद्धेश्वर' ठेवावें असें सागितलें" अशी आख्यायिका आहे.

त्या वरप्रसादाप्रमाणें श्रीरामचद्र-गोदावरी यांचे उदरीं शा. श. १६९९ (सन १७२२) प्रमादी नाम सवत्सरीं चैत्र शु० ९ (रामनवमी) मगळवारीं पुनर्वसु नक्षत्रीं श्रीरामजन्मसमयीं महाराज जन्मास आले व त्याचें नाव "आदेशा"प्रमाणें सिद्धेश्वर असें ठेवण्यात आलें.

पांचव्या वर्षी महाराजाचा व्रतबध होऊन त्याच वर्षी त्याचा प्रथम विवाहही झाला.

त्याना हरभट नावाचे वडील बधू व पाच बहिणी होत्या. महाराज वृत्तीची भिक्षुकी न करतां स्नानसध्यादि धर्मकृत्यात मग्न असत. वेदपठणासाठीं ते पुढें पैठणास जाऊन राहिले. तेथें सत अमृतराय याची भेट होऊन त्याच्या सत्सगतीचा लाभ झाला अमृतरायजीनीं लवकरच महाराजावर अनुग्रह केला.

यानतर महाराजाच्या पत्नी वारल्या तेव्हां त्यानीं दुसरा विवाह केला. पुढें महाराजाचे वडील कैलासवासी झाले पैठण येथेंच एक वर्ष राहून महाराजानीं वडिलाच्या उत्तरक्रियादिकाचा विधियुक्त पुत्र धर्म केला. पैठण येथें लोकाची उपाधि होऊ लागली म्हणून श्रीगुरु अमृतराय याच्या आज्ञेनें, त्याचे गुरुबधु " श्रीस्वामी अद्वैतानंद याचे जवळ अध्ययन करण्यासाठीं काशीस गेले. तेथें असताना आत्मानुभव यावा अशी प्रार्थना महाराजानीं त्याना केल्यावरून " पुस्तकें बाजूस ठेवून आम्ही सागतो तसें करा म्हणजे ठेवा सापडेल " असें श्रीअद्वैतानदानीं त्याना सागितले. त्याच्या आज्ञेप्रमाणें पधरा दिवस साधन केल्यावर महाराजाना इच्छित आत्मप्रचीति आली.

महाराजांची गुरुपरंपरा:—"श्रीविष्णू, धातृ, सनकादिक, नारद, बादरायण, शुक, पूर्णानंद, ज्ञानानंद, व अमृतराय. महाराजांच्या बहुतेक अभंगात "पूर्णानंद" या नांवाचा उल्लेख श्लेषानें अनेकवेळां आला आहे. अमृतरायांचा उल्लेख दोनदाच आला आहे. ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

महाराज काशींत दोन वर्षे राहिले. नंतर श्री. अद्वैतानंदांनीं समाधि घेतली. समाधि घेणेंपूर्वी "यापुढें तुमचें कार्य दक्षिणेस असल्यानें तिकडे जावें" अशी त्यांनीं महाराजांनां आज्ञा दिल्याप्रमाणें श्री अद्वैतानंदांच्या समाधीनंतर ते काशीहून निघून फिरत फिरत कृष्णानदीकाठच्या 'कोळें नृसिंव्हपूर' येथें आले व तेथें श्री नृसिंव्हमूर्ति असलेल्या भुयारात तपश्चर्या करीत आठ वर्षे राहिले. नृसिंव्हपुरीं असतानां आठ दिवसांनीं एकवेळ लाह्याचे पिठाची भिक्षा मागून ते उदर निर्वाह करीत. शेवटीं तेथेंही उपाधि होऊं लागली म्हणून तेथून दोन कोसांवर असलेल्या श्रीपशुपती महादेवाचे स्थानीं जाऊन त्यानीं एक वर्ष पर्यंत तपश्चर्या केली.

याप्रमाणें काशीस २, नृसिंहपुरास ८ व पशुपती महादेवाचें ठिकाणीं १, अशीं ११ वर्षे घालवून मातुश्रींनां

भेटून बारा वर्षे होऊं नयेत म्हणून ते बाबऱ्यास परत येण्यास निघाले. वाटेंत औरंगाबादेस येवून श्रीसद्‌गुरू अमृतराय यांनां भेटले व त्यांनां मागील अकरा वर्षांतील सर्व हकीकत निवेदन केली; ती ऐकून सद्‌गुरूनीं सहर्ष महाराजांची पाठ थोपटली व "तुम्ही आम्हाहून बहुत अधिक झालांत" अशी त्यांची वाखाणणी केली तेथून सद्‌गुरूंची अनुज्ञा घेऊन महाराज बाबऱ्यास आले व बंधु भगिनींनां भेटले; परंतु मातुःश्री तेथें नव्हत्या. पुत्रविरहानें व्याकुळ होऊन महाराजांच्या शोधार्थ घरदार सोडून भटकत होत्या. त्या औरंगाबादेस अमृतराय यांनां भेटल्या "सिद्धेश्वर कोठें आहेत हें आपणास माहीत नाहीं परंतु लौकरच भेट होईल असें त्यांनीं त्यानां सांगितलें. तेव्हा शोध करीत करीत कोल्हापुरास येऊन राहिल्या हें वर्तमान महाराजांनां समजल्यावर त्यांनीं मातुश्रींना बाबऱ्यास आणविलें. नंतर पत्नीनाही कळमसऱ्याहून आणविलें. स्वग्रामीं तीन महिने राहून माता व पत्नी यांचेसह ते पंढरपुरास 'श्रीविठ्ठला"चे दर्शनास गेले व तेथून नृसिंव्हपुरास येऊन राहिले. तेथें त्यांना सर्व लोक "भटजीबाबा" या नांवानें संबोधीत असत. महाराजांनीं पुष्कळ प्रवास केला. या प्रवासांत इतिहास प्रसिद्ध महादजी शिंदे, नाना फडणवीस, सखारामबापू, रघुनाथराव

पंतसचीव व श्रीमत काशीबाईसो पंतप्रतिनिधि कन्हाडकर इत्यादि थोर स्त्री पुरुषानीं त्यांची कीर्ति ऐकून त्याचें दर्शन घेतलें, व पतसचीव यानीं त्याचा अनुग्रहही घेतला. सिंहस्थित गुरु म्हणून नाशिक त्र्यंबकेश्वर क्षेत्रास जाण्याकरिता ते निघाले. पुण्यासही त्याची कीर्ति पोंहोचली होती. ते येऊरहून परस्पर नाशकास जाणेच्या विचारात असता त्याना माधवराव ( सवाई ) पेशवे याना दर्शन देणेसाठीं नाना फडणवीस व सखारामबापू यानीं विनती केल्यावरून ते पुण्यास गेले. तेथें श्रीमंत भाऊसाहेब पेशवे याच्या पत्नी श्री. पार्वतीबाईसाहेब यानीं महाराजाचेकडून अनुग्रह घेतला.

कोल्हापूर छत्रपती श्रीशिवाजीमहाराज ( थोरले *शिवाजीमहाराजापासून तिसरे ) यानीं महाराजाकडून* अनुग्रह घेतला, त्यासंबंधी घटना मोठी अपूर्व व चमत्कृतिपूर्ण आहे. शिवाजीमहाराज याचे पाठीवर करटासारखा काहीं मोठा रोग झाला होता व त्यामुळें ते अत्यस्थ स्थितींत पडून होते. त्यांना स्वप्नात एका गौरवर्ण, मस्तकीं शालनामा, पायात खडावा, रेशीमकाठी धोतर, भालीं गोपीचंदन या वेषांतील पुरुषाचें दर्शन झालें व " अप्पा तू असा दीन कां झाला आहेस " असें म्हणून त्यानें राजाचे पाठीवरून हात फिरविला व त्यांनां

नाममंत्र दिला. राजे जागे होऊन पहातात तों तें करटासारखें होतें तें फुटून त्याना आराम वाटला, व पुढें लौकरच राजे त्या रोगांतून मुक्त झाले. यामुळें अर्थात् त्यानीं आपले सद्गुरु शोधून काढणेचा प्रयत्न केला. अनेक साधुसतांना कोल्हापुरीं आणून आपले सद्गुरु त्यात मिळतात का हें ते पाहू लागले. शेवटीं तोरगलकर शिंदे यांचेकडून महाराजाची माहिती मिळाली व शिंद्यानीं महाराजांना कोल्हापुरास आणून महाराजाचीं व राजांची भेट करविली. महाराजांनां पहातांच स्वप्नातील रूपाची ओळख पटली व महाराजानीं राजाना पहातांच 'अप्पा' अशी हाक मारली. त्यामुळें हेच ते आपले सद्गुरु अशी राजाची खात्री झाली. पुढें राजानीं व महाराणीसाहेबानीं महाराजांचेकडून पुन. तोच नाममंत्र घेतला तेव्हांपासून महाराजाचे घराण्यास छत्रपतींच्या सद्गुरूचें घराणें म्हणून 'श्री' व 'महाराज' या उपाधि यांच्या घराण्यातील स्त्री पुरुषाच्या नावास लावल्या जाऊ लागल्या व त्यांचें घराणें 'गुरुमहाराज' घराणें म्हणून प्रसिद्धी पावलें.

महाराजांना तीन पुत्र व दोन कन्या होत्या. थोरले श्री रामचंद्र पंडित उर्फ बाबा महाराज, मधले, श्री नारायण पंडित उर्फ नाना महाराज व धाकटे श्री वासुदेव पंडित उर्फ भाऊ महाराज, वडील कन्या बहिणाबाई व धाकटी

कृष्णाबाई. महाराजांचे तीनही पुत्र अतीशय विद्वान् परंतु थोरले पुत्र श्री बाबामहाराज यांचेवर पूर्ण गुरुकृपा झाली व धाकटे पुत्र श्री भाऊमहाराज यांनीं महाराजांचे पश्चात् वडील बंधूंच्या आज्ञेवरून छत्रपतींचे दिवाण म्हणून कांहीं दिवस काम केलें व ब्रिटिश सरकारचे दरबारी छत्रपतींचे राजकीय सल्लागार म्हणून काम केलें. श्री बहिणाबाईंचा विवाह आनंदराव प्रतिनिधि विशाळगडकर यांचेशीं झाला. आनंदरावाचे पश्चात् त्या मलकापूर जवळील कापशी या गावीं राहिल्या. त्यांच्या थोर चारित्र्यामुळें त्यांचा लौकिक फार वाढला. तेथें त्यांच्या समाधीचा दरसाल अद्यापही उत्सव होत असतो. कृष्णाबाईचा विवाह खंडेराव देशपांडे कडेगांवकर यांचेशीं झाला. पति पत्नी पुढें तीर्थ यात्रेस जात असतां खंडेराव पटकीनें आजारी पडले तेव्हा पतिचरणीं मस्तक ठेऊन पतीच्या अगोदर दोन घटका कृष्णाबाईनीं आपले प्राण विसर्जन केले

महाराजांनीं आपल्या अनेक शिष्यांना आपल्या कृपेनें संकटमुक्त केलें; त्यांत करवीर दरबारचे थोर थोर *सरदार व मुत्सद्दीही होते. त्यांची कीर्ति सर्व प्रांतभर* पसरली होती. याच वेळीं कविश्रेष्ठ श्री. मोरोपंत पराडकर यांनीं महाराजांचें दर्शन घेतलें व त्यांचा श्रेष्ठ अधिकार

पाहून आपल्या प्रसिद्ध सन्मणिमालेमध्यें महाराजांचें नांवानें खालील कविता केली आहे.

> नमिले मी "श्रीभटजीवावा"चिया सुपदकमळा ।
> या सन्मणिमालेला सापडलें हें सुपदक मला ॥ आर्या

कोल्हापूरच्या राज्यांत पटवर्धन सरदार वारंवार स्वाऱ्या करीत, त्यावेळींही आपल्या शिष्याचें व त्याचे राज्याचें महाराजांनीं अनेक वेळां रक्षण केलें शेवटीं पटवर्धनांनीं कोल्हापूर जिंकण्याचा नाद सोडून दिला. पुढें दुष्काळांत महाराजांनीं अन्नदान करून सहस्रावधि दुष्काळ पीडितांचें रक्षण केलें. एकदां नृसिंव्हपुरावर स्वारी करून आलेल्या शिंद्याच्या पलटणींतील पठाणाना सुबुद्धि देऊन त्यांची स्वारी महाराजांनीं परतविली. अशा त्यांच्या सामर्थ्याच्या व भूतदयेच्या कित्येक कथा त्यांच्या चरित्रांत वर्णन केल्या आहेत. नृसिंव्हपुरांत असतांना एकदां पहाटे महाराज एका सुसरीच्या पाठीवर संध्येस बसले. सकाळीं लोकांनीं हें पाहिल्यावर ही गोष्ट महाराजांच्या नजरेस आणली. महाराज उठून गेले व सुसरही पाण्यांत निघून गेली. नृसिंहपुराजवळ कृष्णेच्या डोहांत सुसरींचा फार त्रास असे. म्हणून महाराजांनीं 'रजक धोंड्या'पासून नृसिंहतीर्थाच्या डोहापर्यंतच्या भागांत सुसरी

मनुष्यांचा वा जनावरांचा घात करणार नाहींत असा निर्बंध घातला व त्या निर्बंधाप्रमाणें आजपर्यंत कोणाचाही घात झाला नाहीं असें सांगतात.

महाराजांनीं समाधि घेण्याचा विचार केला असें वाटल्यावरून महाराजांचे नि:सीम व ज्ञानी भक्त स्वामी पूर्णानंद यांनीं विनंती केली कीं ज्येष्ठ चिरंजीव श्रीबाबामहाराज यांचेवर पूर्ण कृपा करावी म्हणजे महाराजांची परमार्थ परंपरा ते पुढें चालवितील. श्रीबाबामहाराजांची परमार्थापेक्षां पांडित्याकडे अधिक प्रवृत्ति होती हें महाराजांना आवडत नव्हतें; म्हणून "बाबाला पांडित्यच करूं दे. त्याला परमार्थ कोठें हवा आहे?" असें म्हणाले. पुढें पूर्णानंदांनीं श्रीबाबामहाराजांना सर्व गोष्टी समजावून सांगितल्यामुळें त्यांना आपण शब्दज्ञानासाठीं परमार्थाची पूर्ण उपेक्षा केली याबद्दल पूर्ण पश्चात्ताप झाला व ते महाराजांना अनन्य शरण गेले व महाराजांच्या कृपेनें त्यांना आत्मज्ञान प्राप्त झालें.

याप्रमाणें महाराजांनीं परमार्थांत कृतार्थता मिळवून, आत्मस्थिति प्राप्त करून घेऊन दीर्घ काल जगदुद्धाराचें थोर कार्य करून प्रपंच ही उत्तम करून दाखविला महाराजांनीं शके १७२३ ( इ. स १८०१ ) दुर्मतिनाम संवत्सरीं वैशाख

" श्रींची उत्सवमूर्ति "

व. ६ सोमवारी ब्राम्हमुहूर्तीं सूर्योदयापूर्वीं समाधि घेतली. समाधी घेणेची वेळ जवळ आली तेव्हां महाराजांनीं पूर्णानंदयती, शिवाजीराजे व ज्येष्ठ पुत्र श्री बाबामहाराज यांनां जवळ बोलाविलें व पद्मासन घालून नासाग्रीं दृष्टि ठेवून ओंकाराचा उच्चार करून शांकरभाष्यांत वर्णिल्या-प्रमाणें योग्याच्या विधेचें ज्ञान सांगितलें व महासमाधि लावून देहाचा त्याग केला. त्यानंतर त्याची समाधि बांधणेंत येऊन उत्सवमूर्तीचीही स्थापना करणेंत आली व त्यांच्या पुण्यतिथि निमित्त दरसाल वैशाख व०. प्रतिपदा ते वैशाख वद्य सप्तमी अखेर सात दिवस अत्यंत थाटानें उत्सव अद्यापही साजरा केला जात आहे.

सदरची श्रींची उत्सवमूर्ति खालील प्रसंगीं श्रींच्या वाड्यांतून निघते व त्यांतील पहिल्या प्रसंगाखेरीज करून बाकीच्या सर्व प्रसंगीं, श्रींचे शिष्य श्रीशिवाजीमहाराज व त्यांचे पुत्र श्रीसंभाजीमहाराज या उभयतांच्या पालख्या श्रींचे पालखीमागें लवाजम्यासह असतात.

१. वैशाख व. १ ला वाड्यांतून निघून पंचगंगेवरील त्यांचे समाधिस्थानीं जाते.

२. आश्विन शु. ५ त्र्यंबुली यात्रेच्या दिवशीं त्र्यंबुली देवींचे स्थानीं जाऊन पुनः परत येते.

३. विजया दशमी.

४. आश्विन शु० ८

५. वैशाख व० ६ श्रींचा पुण्यतिथि दिन.

अशा थोर सत्पुरुषानें लिहिलेल्या अभंगाचें व दोह्यांचें आज प्रकाशन होत आहे हा भाग्याचा योग आहे असें मला वाटतें. फक्त तीस अभंग व दहा दोहेच उपलब्ध आहेत. त्यांचें आणखीं कांहीं लिखाण असणेचें संभवतें पण तूर्त तरी तें उपलब्ध झालेलें नाहीं. पण जें मिळालें तेंच फार मोलाचें आहे व तें प्राप्त झालें यांतच आपण धन्यता मानूं या.

—प्रकाशक

प्रकाशकांचे घराण्यांत नित्य पूजेत असलेल्या
श्रींच्या " चरण पादुका "

भाग १

# श्रीसिद्धेश्वरमहाराजांचे अभंग.

## ४. "पूर्णानंद सद्गुरूच विश्वंभर दाखवितात.

दावी विश्वभरा तोचि गुरुवरा । वारी या ससारा वचनमात्रें
मंत्रतत्रकळा शब्दाची चिरपत्ती । तेणें स्वात्मप्राप्ती नाहीं नाहीं
यज्ञ तप दान व्रतें तीर्थाटन । तेणें ब्रह्मज्ञान नाहीं नाहीं
नाशी अहंकार करी निर्विकार । साधका दे थार ब्रह्मानदीं
स्वप्रभ स्वच्छंद[1] तोचि पूर्णानद[2] । सरले भेदाभेद[3] जये रूपीं ॥
सिद्धेश्वरी सिद्ध वस्तूंचा[4] व्यापार । अवघे चराचर एकरूप ॥ ४ ॥

---

१ स्वच्छद – आपल्या इच्छेन वागणारे, स्वतत्र

२ पूर्णानद महाराज हे सिद्धेश्वर महाराजाचे पणजेगुरु होत तरी त्याच्या नावाचा, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, उल्लेख अनेक अभगात आहे महाराजाचे सद्गुरु अमृतरायमहाराज याचा उल्लेख दोनच अभगात आहे

३ भेदाभेद – ब्रह्म द्वद्वातीत आहे, सुख-दु ख, ज्ञान-अज्ञान, सत्-असत् , भेद-अभेद दोन्हीही त्या ठिकाणी नाहींत या वेदातातील सिद्धाताचा येथें उल्लेख आहे

४ सिद्धेश्वराना सव काही सिद्धवस्तूचा म्हणजे ब्रह्माचा खेळ आहे ह समजले त्याच्या दृष्टीने सर्व विश्व हा चिद्विलास आहे पचभूतादि अनत भेद ही माया आह तत्वत सर्व एक-रूप, ब्रह्मरूप आहे

# ( ४ ) भावार्थ.

[ यानंतर साधनमार्गाचा म्हणजे चवथ्या पायरीचा विचार. ]

एक सद्गुरूच देव दाखवूं शकतात. केवळ शद्बानें ते संसारपार करतात. मंत्रतंत्रांनीं आत्मप्राप्ति होत नाहीं. यज्ञ, तप, दान मंत्रतंत्र, शद्बज्ञान यांनीं ब्रह्मज्ञान होत नाहीं सद्गुरूच अहंकाराचा नाश करून शिष्याला निर्विकार करितात; त्याला ब्रह्मानंदात स्थिर करितात. सद्गुरु हे स्वप्रभ, स्वच्छंद, पूर्णानंद असून त्यांचे ठिकाणीं भेदभाव उरलेला नसतो सिद्धेश्वरांना हें चराचर विश्व म्हणजे केवळ चिद्विलास आहे.

## ५. "सच्चिदानंद सद्गुरूच मोक्षसाम्राज्याचें दान करितात."

बाप निवांत निवांत । सर्व सुखाची विश्रांत ॥
बैसे अचल विमानीं । मोक्षसाम्राज्याचा दानी ॥
सच्चित्सुखें राज्य करी । देह ठेवुनी निर्विकारीं ॥
जो का सर्व शांत दांत । करी भक्तां सर्वगत ॥
जेथें सरले भावाभाव । तोचि सिद्धेश्वरा देव ॥ ५ ॥

---

१ ब्रह्म हे विमानाप्रमाणे निरालंब, आधाररहित आहे, म्हणून ब्रह्माला विमानाची उपमा दिली आहे परंतु ते आधार-रहित असूनही विमानाप्रमाणे चल नाही, अचल, स्थिर आहे अशा अचल विमानात म्हणजे ब्रह्मस्वरूपात सदगुरु बसतात. अर्थात्, ब्रह्मरूप झालेले असतात

२ भावाभाव म्हणजे असणे-नसणे, सत्-असत् ब्रह्म हे सदसद्विलक्षण आहे या वेदान्तातील गहन सिद्धांताचा येथे उल्लेख आहे

## (५) भावार्थ

सद्गुरु अत्यंत शांत असून तेथें सर्व सुखाची विश्राती आहे. ते अचल विमानात बसून साधकाला मोक्ष साम्राज्याचें दान करितात. निर्विकार ब्रम्हाच्या ठिकाणीं राहून, सच्चितानंदरूप होऊन ते राज्य करतात. ते स्वत शांत-दांत असतात. तेच भक्ताला देवरूप करून सनगत करितात. ते ब्रह्मप्रमाणेंच सदसद्विलक्षण आहेत, तेच देव होत.

## १७. 'मौन होंचि स्तुती नाम', मौन हेंच देवाचें वर्णन."

पाहोनिया रूप घाली माझी पुची।
काय करूं स्तुती रामराया॥
श्रुति आणि स्मृती कर्पीजन देवा।
स्मरतां या केशवा भागलेती॥
सिद्धेश्वर म्हणे मौन तुझ्या पायीं।
घेळोघेळा डोई ठेवी रामा॥

## ( १७ ) भावार्थ.

हे रामराया, तुझें रूप पाहून माझ्या मना
समाधान वाटलें; तुझी स्तुति मी कशी करूं ! श्रुति स्मृ
ऋषि देव हेही कशावाचें स्मरण व स्तुति करतांना भाग
तेथें माझा काय पाड ! वारवार तुझ्या चरणावर मस्त
ठेवून मौन धरून बसणें हेंच उत्तम.

## १७. 'मौन होंचि स्तुती नाम', मौन हेंच देवाचें वर्णन."

पाहोनिया रूप धाली माझी वृत्ती ।
काय करूं स्तुती रामराया ॥
श्रुति आणि स्मृती ऋषीजन देवा ।
स्मरतां या केशवा भागलेती ॥
सिद्धेश्वर म्हणे मौन तुझ्या पायीं ।
घेळोवेळा डोई ठेवी रामा ॥

## ( १७ ) भावार्थ.

हे रामराया, तुझें रूप पाहून माझ्या मनाला समाधान वाटलें; तुझी स्तुति मी कशी करूं ! श्रुति स्मृति, ऋषि देव हेही कशवाचें स्मरण व स्तुति करतांना भागले, तेथें माझा काय पाड ? वारवार तुझ्या चरणावर मस्तक ठेवून मौन धरून बसणें हेंच उत्तम.

## १८. देवाच्या प्रेमानें अनेक भक्त युगायुगीं वेडे झाले आहेत.

---

ब्रह्मसुखें झाले वेडे । त्यांसी संसार न घडे ॥
सनक सनंदन पाहीं । ज्यां देहाची शुद्धी नाहीं ॥
कपिल नारद शुक यती । केली संसाराची माती ॥
ध्रुव प्रल्हाद तो बळी । केली संसाराची रळी ॥
रामें भरत केला वेडा । टाकी माता राज्य वाडा ॥
दुजा हनुमंत वेडा । रात्रंदिवस उभा पुढां ॥
ऐसे वेडे युगायुगीं । ब्रह्मसुखाचे विभागी ।
पूर्णानंद झाला वेडे । सिद्धेश्वरीं शुद्धी उडे ॥

## ( १८ ) भावार्थ.

---

जे ब्रह्मसुखानें वेडे होतात त्याना संसार करताच येत नाहीं कपिल, नारद, शुक यांनीं ससाराची माती केली. ध्रुव, प्रह्लाद व वळी यानीं ससाराचा नाश केला. रामाच्या प्रेमानें भरत वेडा झाला व त्यामुळें त्यानें आई राज्य, मोठे-पणा, राजवाडा या सर्व वैभवाचा त्याग केला. आणखी एक रामवेडा हनुमत. तो सदा रामाच्यापुढें उभाच राहिला आहे. ब्रह्मसुखाचे असे अनेक वारस युगायुगीं होऊन गेले, ते सर्व वेडेच झाले. हाच पूर्णानद हातीं आल्यानें सिद्धाश्वरांची हीं शुद्धि उडाली व तेही वेडे झाले.

## १९. चिन्मयाचें चिंतन केल्यानें गुरुकृपेनें अक्षर वस्तूची प्राप्ती होतें.

---

चिंतितां चिन्मय । जालों मी तन्मय ॥
निरालंबी वृत्ती ब्रह्माकार स्थिती । अक्षर वस्तू प्राप्ती गुरूकृपे ॥
योग वृत्तीनिरोध सांख्यज्ञान सिद्ध । पूर्ण निज-बोध गुरूकृपें ॥
असंगे सगती दुर्जेवाण रती । सर्वसुख प्राप्ती गुरूकृपें ॥
सत्यज्ञानानंत आत्मा हा नितांत । सिद्धेश्वर शांत गुरुकृपें ॥

## ( १९ ) भावार्थ.

चिन्मय देवाच्या चिंतनानें मी तद्‌रुप, ईश्वरस्वरूप झालों. आधाररहित अशा ब्रह्माच्या ठिकाणीं वृत्ती राहिली, त्यामुळें मला ब्रह्मस्थिति प्राप्त झाली; गुरूकृपेनें अविनाशी ब्रह्माची प्राप्ति झाली. योगांत सांगितलेला 'चित्तवृत्तिनिरोध साधला, सांख्यशास्त्रांत सांगितलेलें ज्ञान सिद्ध झालें; गुरु-कृपेनें, पूर्ण आत्मप्रचीति मिळाली. त्याच कृपेनें संगरहित देवाची संगति लाभली, दुसऱ्यावाचून ( स्वत शींच ) रत ( आत्मरत ) होण्याचा आनद लाभला, सर्व सुखाची प्राप्ति झाली. सत्य-ज्ञान-अनत या लक्षणांना युक्त असा आत्मा शांतिरूप आहे; तद्‌रूप होऊन सिद्धेश्वरही शांत झाले.

## २०. सप्रेम नामस्मरणानें होणारें अभेदज्ञान म्हणजेच आत्मनिवेदन.

---

वाचे रामनाम मनीं दृढ प्रेम । बुद्धी बोधे धाम आंतुडलें[१] ॥
अवस्था भयातीत अभेद समाधी । सरे आधिव्याधी पूर्ण बोध ॥
ज्ञेयज्ञाता ज्ञान सरे हा अनुमान । अभेद तें ज्ञान सत्य जाणा ॥
आत्मनिवेदन हेंचि पूर्णज्ञान । सिद्धेश्वरी पूर्ण पूर्णानंद ॥

---

१ सापडले, प्राप्त झाले

## (२०) भावार्थ

मुखात रामनाम, मनांत देवाबद्दल प्रेम व बुद्धीच्या ठिकाणीं आत्मज्ञानाची जागृति या गोष्टींमुळें निजधाम जो परमेश्वर त्याची प्राप्ति झाली. हीच भयाच्या पलीकडची अवस्था, हीच जीवब्रह्माच्या ऐक्याची समाधी, [illegible] पूर्ण बोध. या ठिकाणीं आधिव्याधि संपतात. येथें [illegible], ज्ञेय ही त्रिपुटी नाहींशी होऊन केवळ ज्ञान [illegible]ही सरतें. हेंच आत्मनिवेदन, हेंच पूर्ण

## २०. सप्रेम नामस्मरणानें होणारें अभेदज्ञान म्हणजेच आत्मानिवेदनं.

धाचे रामनाम मनीं दृढ प्रेम । बुद्धी बोधे धाम आंतुडलें[१] ॥
अवस्था भयातीत अभेद समाधी । सरे आधिव्याधी पूर्ण बोध ॥
ज्ञेयज्ञाता ज्ञान सरे हा अनुमान । अभेद तें ज्ञान सत्य जाणा ॥
आत्मनिवेदन हेंचि पूर्णज्ञान । सिद्धेश्वरी पूर्ण पूर्णानद ॥

---

१ सापडले, प्राप्त झाले

## ( २० ) भावार्थ

---

मुखांत रामनाम, मनांत देवाबद्दल प्रेम व बुद्धीच्या ठिकाणीं आत्मज्ञानाची जागृति या गोष्टींमुळें निजधाम जो परमेश्वर त्याची प्राप्ति झाली. हीच भयाच्या पलीकडची अवस्था, हीच जीवब्रह्माच्या ऐक्याची समाधी, हाच पूर्ण बोध. या ठिकाणीं आधिव्याधि संपतात. येथें ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय ही त्रिपुटी नाहींशी होऊन केवळ ज्ञान उरतें, अनुमानही सरतें. हेंच आत्मनिवेदन, हेंच पूर्ण ज्ञान, येथेंच पूर्णानंदाची प्राप्ति आहे.

## २१. एक सद्गुरुकृपेनेंच आत्मप्राप्ति होते, जगदीश प्रगटतो.

---

गुरु करी तरी घडे स्वात्मप्राप्ति । इतरा हे स्थिती नातुडेचि ॥
केलें ब्रम्हरत हेंचि माझें व्रत । चालवी निवांत सर्वकाळ ॥
मनीं या उन्मन संकल्पाचा नाश । विकल्पीं जगदीश प्रकटला ॥
बुद्धी बोधें मुरे अहंकार नुरे । अनंतत्वें स्फुरे हाचि जीव ॥
चित्त चिदाकार चिन्मयीं व्यापार । आत्मा चराचर अनुस्यूत ॥
वासुदेवीं वास स्वात्मनिवेदन । भक्ती योग ज्ञान हेंचि सत्य ॥
सिद्धेश्वरीं बोध तोचि पूर्णानंद । सरले भेदाभेद जयें रूपीं ॥

## (२१) भावार्थ.

गुरूनें केलें तरच आत्मप्राप्ति होईल. इतरांना निगुऱ्यांना, हें पद मिळत नाहीं. सद्गुरूनीं मला ब्रह्मरत केलें. हेंच ब्रह्मरत होऊन राहण्याचें माझें मत त्यांनी शांतपणें चालवानें. मन उन्मन होऊन संकल्पांचा नाश झाल्यावर, कल्पनारहित अंतःकरणांत देव प्रकट झाला. तेथें बुद्धि, ज्ञान, किंवा अहंकार यांचें स्फुरण होत नाहीं; जीव अनंत अशा ब्रह्माच्या रूपानें राहतो. चित्त ज्ञानरूप होतें, सर्व व्यवहार ज्ञानापर्यंतच होतात, चराचर विश्वांत आत्मा भरून राहिला आहे असा प्रत्यय येतो. हेंच पूर्ण ज्ञान सिद्धेश्वरांना झालें; हाच पूर्णानंद होय. या अवस्थेंत भेदाभेदांचा संपूर्ण नाश होतो.

## २२. चिन्मयभुवनांत राम पाहिला; तोच देहांत आत्मा, सर्वत्र विश्वांत परमात्मा.

चिन्मय भुवनीं आत्मा श्रीराम देखिला। पूर्णसुख पूर्णकाम ॥
तो हा देही आत्माराम। सर्वां सर्वत्र संचला ॥
निरालंब शून्यवृत्ती, ब्रह्माकार होता स्थिती। स्वये पूर्णानंद पावला ॥
सर्वोत्तम सर्वसाक्षी, सोहंभावे तया लक्षी, तोचि क्षरीं अक्षर पावला ॥
बुद्धी बोधेसीं मुरे, आत्मा अनंतत्वे स्फुरे, तोचि सिद्धेश्वरी एकला ॥

## [२२] भावार्थ

. चिन्मय भुवनांत आत्मा म्हणजेच श्रीराम पाहिला. तो आनंदमय आहे, पूर्णकाम आहे. तोच या देहांत आत्मा म्हणून नांदतो, व सर्व चराचरांतही भरलेला आहे. वृत्ति ब्रह्माकार झाली म्हणजे शून्यवृत्ति होते, ( मन कल्पना रहित होते ). तें निरालंब म्हणजे अधाररहित. अशा ब्रह्माशी ऐक्य पावल्यानें निरालंब होतें. त्या स्थितींत पूर्णानंद प्राप्त झाला. तो आत्माराम सर्वोत्तम व सर्वसाक्षी आहे. "तोच मी" या भावानें मी त्याचें ध्यान करतो. या नाशवंत देहांतच मला तो अविनाशी आत्माराम पावला. त्याला पाहिल्यावर बोधासकट बुद्धि नाहींशी होते, जीवात्मा अनंत परमात्म्याच्या रूपानें विलसतो. सिद्धेश्वरांच्या ठिकाणीं तोच एकला एक उरला आहे.

## २३.-रामाच्या कुळांतील भक्तांचीं लक्षणें.

आह्मी त्याचे कुळीं झालों । बोधसुधापानें धालों ॥
पूर्णानंद पूर्ण भला । सर्वी सर्वत्र संचला ॥
सत्यज्ञानसुखरूप । जया नाहीं योगायोग ॥
सिद्धेश्वरीं सिद्ध वस्तू । निराधारीं केला वास्तू ॥

## (२३) भावार्थ.

---

आम्ही रामाच्या कुळांत जन्माला आलों; व ज्ञानामृताच्या पानानें तृप्त झालों. आनंदमय ब्रह्म सर्वत्र भरलेलें आम्हाला दिसतें. तें ब्रह्म सत्यज्ञानआनंदस्वरूप आहे; ते योग किंवा वियोग यांच्या पलीकडे आहे. सिद्धेश्वरांना ही सिद्धवस्तु (ब्रह्म) प्राप्त झाली आहे; त्यांनीं आधाररहित अशा ब्रह्माच्या ठिकाणीं वास केला आहे.

## २४. रामच आमचें सर्वस्व, अन्य कांहीं दिसत नाहीं

---

राम आम्हां लागी पिता । सीतादेवी आम्हां माता ॥
बंधू वैष्णव सकळ । गृह अवघाची भूगोळ ॥
वित्त नवविधा भक्ती । वृत्ती आम्हा स्वरूपस्थिती ॥
सिद्धेश्वरीं समाधान । रामावीण आन न दिसेचि ॥

# (२४) भावार्थ

---

राम आमचा पिता, सीतादेवी आमची माता सर्व वैष्णव हे आमचें बधु, सर्व भूगोल आमचें घर. नवविधा भक्ति हें धन, स्वरूपीं राहणें ही आमची वृत्ति (धंदा). सिद्धेश्वरांना पूर्ण समाधान लाभलें आहे त्याना रामाशिवाय काहीं दिसत नाहीं

## २५. रामाचें अखंड ध्यान हेंच खऱ्या सुखाचें साधन.

---

विधिसुरइंद्रपद । तेथें सुधारसस्वाद ॥
त्याच्या पतनीं महाशोक । अवघे शोकमय लोक ॥
जप तप अनुष्ठान । तीर्थयज्ञादि साधन ॥
तेणें द्वंद्वदुःख जीवा । आतां सोडवी देवा देवा ॥
जालों शास्त्रज्ञ पंडित । जाणों धर्म-कर्म-नीत ॥
परि तो नटा भूपवेश । नाहीं अंतरी सुख-लेश ॥
एक मागणें तुज रामा । सर्व सुखाच्या विश्रामा ॥
अवस्थात्रयीं तुझें ध्यान । पूर्ण बोधें सुधापान ॥
सिद्धेश्वरीं सिद्ध वाचा । राम दयाघन साचा ॥
पूर्णामृतें वृष्टी केली । पूर्णानंदीं वृत्ती घाली ॥

## (२५) भावार्थ.

ब्रह्मा, देवगण, इंद्र यांचीं पदें लाभलीं तर अमृतरसाचें सेवन करावयाला मिळतें. पण तेथून पतन झालें म्हणजे फार दुःख होतें म्हणून हे लोक दुःखमय आहेत. जप, तप, तीर्थ यज्ञ, अनुष्ठानें इत्यादि साधनें करण्यांत पापपुण्य, रागद्वेष इत्यादि द्वंद्वाचे क्लेश आहेत. या सर्वांपासून, देवा, आतां मला सोडव. शास्त्रज्ञ पंडित झालों, धर्मनिति मला समजूं लागली तरी ती नाटकांतील राजाची स्थिति. या ज्ञानानें मनाला सुखलेशही मिळत नाहीं. हे सर्व सुखाच्या विश्रामा रामा, तुला एकच मागणें आहे; जागृत्स्वप्नसुषुप्ति या तीन्ही अवस्थांत तुझें ध्यान असूं दे, व सदा पूर्ण आत्मज्ञानामृताचें सेवन असूं दे. सिद्धेश्वराची वाचा सिद्ध (अमोघ) आहे, राम खरा दयाळू आहे. त्यानें प्रेमामृताची वृष्टी केली व त्यामुळें सिद्धेश्वरांचें अंतःकरण तृप्त झालें.

## २६. जीवन्मुक्ताची पंढरी.

---

आम्हां ब्रम्हांड पंढरी । विठ्ठल दिसे चराचरी
जे कां मुमुक्षाची आई । सद्‌वृत्ती ते रुखुमाई ।।
तुर्या हेचि चंद्रभागा । भीमा उन्मनी हे गंगा ॥
चिन्मय वाळुवंटी पाहे । बोध पुंडरीक आहे ॥
संत महंत निर्विकारी । गाती रामकृष्ण हरी ॥
परतुनि पाहे जड मिटे । सिद्धेश्वरा विठ्ठल भेटे ॥

## ( २६ ) भावार्थ.

---

सर्व ब्रह्मांड हीच आमची पंढरी; आम्हाला सर्व चराचर विश्वांत विठ्ठल भरलेला दिसतो. मुमुक्षुजनांची माताच अशी जी सद्भावना तीच रखुमाई होय. तुर्यावस्था ही चंद्रभागा व उन्मनी अवस्था ही भीमा. चिन्मय वाळुवंटांत बोधरूपी पुंडलीक उभा आहे. तेथें विकाररहित संतमहंत रामकृष्णहरी असा नामघोष करितात. वृत्ति उलटी करून पाहिल्यावर सिद्धेश्वरांना आपल्या देहरूपी जड़विटेवर विठ्ठल भेटला.

## २७. सर्वत्र ईश्वर दर्शन (सर्वं खलु इदं ब्रह्म).

---

वृक्ष आणि वल्ली पर्वत पाषाण। अवघा नारायण
विलसे स्वयें॥
दृश्य हें अदृश्य भूतग्राम सर्व। अवघा वासुदेव
विलसे स्वयें॥
सर आणि सरिता सिंधु क्षुद्र जल। अवघा गोपाळ
विलसे स्वयें॥
सिद्धेश्वर म्हणे आत्मनिवेदन। करी तयां ध्यान
घडे ऐसें॥

## (२७) भावार्थ.

---

वृक्ष, वल्ली, पर्वत, पाषाण या सर्वांत एक नारायणच निलसत आहे. दृश्य व अदृश्य, सर्व भूतजात, यांत स्वत. नारायणच खेळत आहे. सरोवरें व नद्या, सिंधु व ल्हान डबकीं यांत गोपाळच भरला आहे जो आत्मनिवेदन करतो त्यास हें सर्वत्रईश्वरदर्शनाचें ध्यान घडतें

## २८. विश्वंभराची अभेदभावानें पूजा.

करुनी देहाचें देऊळ । आंत बैसविले गोपाळ ॥
केलें पृथ्वीचें चंदन । वाहूं शब्दांचें सुमन ॥
प्राणव्यानाचा केला धूप । देहीं दीप्ती तोची दीप ॥
सर्व सुखाचा नैवेद्य केला । सर्वात्मत्वीं तांबूल दिला ॥
सिद्धेश्वरीं सांग पूजा । जेथें पूजक नुरे दुजा ॥

## (२८) भावार्थ.

देहाचें देऊळ करून त्यांत गोपाळाची स्थापना केली. पृथ्वीचें चंदन केलें. देवाला शब्दाचीं फुलें वाहिलीं. प्राण व व्यान या वायूंचा धूप दाखविला. देहांतील आत्मज्योतीच्या दिव्यानें देवाला ओंवाळिलें. सर्व सुखाचा नैवेद्य दाखविला, सर्वात्मभावाचा ( मीच सर्व विश्व या भावाचा ) विडा दिला. अशी सांग पूजा केली; परंतु मी, पूजक, मात्र देवाहून निराळा राहिलों नाहीं.

## २९, सर्वभक्तांचें कल्याण असो, मंगल असो.

भक्त आणि विरक्त मुमुक्षु साधकजन ।
तया समाधान सदा असों ॥
उत्साह आणि महोत्साह वार्षिक पर्वे सर्व ।
तया वासुदेव निर्विघ्न करो ॥
सुखाचा सुकाळ दु:खाचा दुष्काळ ॥
कल्पना अमंगळ कदा नसो ॥
सिद्धेश्वर म्हणे सर्वांचें कल्याण ॥
ज्या मनीं निधान नारायण ॥

## ३० 'रामाची भक्ती करा' एवढेंच शिष्या-जवळ मागणे

---

हेंचि मागणें शिष्यासी । राम करा हृदयवासी ॥
धरा विपयीं विरक्ती । संत पायासी आसक्ती ॥
करा नवविधा भक्ती । जना लावा हेचि रीती ॥
होऊनियां निर्विकार । निववा सर्वाचें अंतर ॥
सिद्धेश्वराचें हें व्रत । सदा सेवा सर्वगत ॥

## (३०) भावार्थ.

आमच्या शिष्यांजवळ आमचें एकच मागणें आहे. हृदयांत राम धरा, विषयांबद्दल विरक्ति धरा, संताच्या चरणीं प्रेम ठेवा, नवविधा भक्ति करा, व लोकांनाही याच भक्तिमार्गाला लावा. विकाररहित होऊन सर्वांचीं अंतःकरणें निववा. हें सिद्धेश्वरांचें विश्वव्यापी व्रत सदा चालवा.

१. सद्गुरुकृपेनेंच
जाता येतें

जोगीजगमसे वडे, डूबे मीर
जो कोई प्यारा सतका,

२.

वेद पढे, पर भेद न
ज्ञान कहे पर ध्यान न

## १. सद्‌गुरुकृपेनेंच भवाब्धि तरून जाता येतें

जोगीजंगमसे वडे, डूबे मीर अमीर।
जो कोई प्यारा संतका, सो पोहोच्या परतीर॥

## २. ध्यानानेंच दुःखनाश.

वेद पढे, पर भेद न जाने, जोग करे मन भोगी।
ज्ञान कहे पर ध्यान न जाने, सोहि बडो दुखभागी।

## ३. अज निर्गुण देवाला ओळख.

गंगा जमन जहां कुच नाहि, तीरहि नीर समान।
अज निर्गुनको देख जोगी, आपेआप निदान ॥ ३ ॥

## ४. सद्गुरुकृपेवांचून दुःखनिवृत्ति नाहीं.

वेद पढेतु पंडिता कहियो सास्त्र पुरान।
जबलग सद्गुरु न मिले, तबलग दु ख निदान

## [ ३ ] भावार्थ.

जेथें गंगा यमुना नाहीं, जेथें पाणी व तीर सारखेंच आहेत, अशा जन्मरहित निर्गुण ब्रह्माला पाहा; हे योगी आपण आपल्याला पाहून ओळखून घे.

## [ ४ ] भावार्थ.

पंडित वेदाचा अभ्यास करीत व शास्त्रपुराण सांगोत; जोपर्यंत सद्गुरूची कृपा झाली नाहीं तोपर्यंत, दुःखच वाट्याला येईल.

## ५. ईश्वराशीं ऐक्य पावण्याचा उपाय.

---

साधो देही दूर कर हरसो चित्त लगाय।
घट जो महदाकासमो आपे आप समाय ॥५॥

## ६. मनइंद्रियांच्या जयानें रामाची कृपा.

---

पांचो आतमा बश करो मनमो राखो धीर।
पतितपावन दीनदयाल, करुनाघन रघुवीर ॥६॥

## ७. ज्योतीच्या प्रकाशानें देवाला शोध.

कठिन वन पांजरा, निरख निरख पग धार।
जगमग जोत लगायके, सूजो अज अविकार ॥७॥

## ८. संसाराला जिंकणारा विरळा वीर.

देह रहे मैदानमे, वाजत अनहत नूर।
जगमग जोत लगायके, पोहच्या कोई यक सूर ॥८॥

## [ ७ ] भावार्थ.

संसाररूपीं निबिड वन कठीण आहे. म्हणून, पाहून, काळजीनें, पाय टाक. प्रकाशमय आत्मज्योत पाजळून अज व अविकार अशा ब्रह्माला ओळखून घे.

## [ ८ ] भावार्थ.

देह जीवनाच्या रणमैदानांत खडा आहे. अनहत नौबत वाजत आहे. अशा स्थितींत तेजोमय आत्मज्योत पाजळून संसाराच्या, मोयच्या, पार पोहोंचणारा शूर वीर विरळा.

## ९ साधूच्या ज्ञानाचें अतींद्रियत्व.

विन नयन जहां देखे, विन रसना रस चाखे।
चित्त मन विन ध्यान लगावे, वो ही सज्जन मोंं
भावे॥

## १०. जीवन्मुक्ताचें निजघर

माया काया जग नाहिं, नाहिं पवन आकास।
घट बिन मठिया बांधे तहां कियो नित निवास॥

# अभंग

---

भक्त हा रामाचा सखा आहे त्यावर राम कृपा करतो त्यावर पूर्ण माया ठवून अवस्थात्रयात त्याचे रक्षण करतो राम हेंच भक्ताचे पूर्ण सुखधाम आहे (क्र १) हृषीकेशी सुखाचा सागर आहे आनदाची राशी आहे तो हृदयनिवासी आहे त्याच्याशी कपट करू नय तो सर्वज्ञ सर्वगत आहे त्याच्याशी गर्व करून किंवा त्याचा वीट मानून कसे चालेल ? तो मत्रतत्रानी किंवा शब्दज्ञानाने वश होत नाही तो शुद्धभावानेच सुखाने प्राप्त होतो (क्र २) नेहमी राम गावा, ध्यावा हाच आम्हा सताचा कुळधर्म आहे मान व धन लोष्टासम मानावी, परस्त्रिया मातेसमान लेखाव्या, स्तुतिनिंदा टाकून वेदाज्ञने चालावे, विश्वी विश्वभर पहावा, हीच पूजा करावी हा सताचा नेम आहे (क्र ३) यानतर साधनमार्गाचा म्हणजे चवथ्या पायरीचा विचार एक सद्गुरुच देव दाखवू शकतात मत्रतत्रानी आत्मप्राप्ति होत नाही यज्ञतपदानादीनी ब्रह्मज्ञान होत नाही सद्गुरुच अहकाराचा नाश करून शिष्याला निर्विकार करतात, त्याला ब्रह्मानदात स्थिर करतात सदगुरु हे स्वप्रभ, स्वच्छद असून त्याचे ठिकाणी भेदभाव उरलेला नसतो (क्र ४) ते अत्यत शात असून तेथें सर्व सुखाची विश्रांति आहे ते अचल विमानात बसून साधकाला मोक्षसाम्राज्याचे दान करितात

तेच भवनाला देवरूप करून सर्वगत करतात तेच देव होत (क्र ५) सद्गुरूची कृपा संपादून ब्रह्मसुखाची प्राप्ति करून घ्यावी त्याच्या कृपेने जे रामदास झाले ते जगात उदासीन राहतात, दृश्यजगत् सोडून ब्रह्मस्थितीत राहतात वर्णाश्रमाच्या बाह्य आचारवेषादिकाची त्याना आवश्यकता नसते वासना त्यागून, वृत्तिरहित होऊन चिन्मयात वास करणे हाच खरा सन्यास जीवभावाचा, 'मी माझे' याचा त्याग केल्यावाचून फुकट हे ब्रह्मसुख मिळत नाही वेद नेति म्हणतात तेथे मानवी बुद्धि किती पोहोचणार? यासाठी मन सद्गुरुना अर्पण करा व हे ब्रह्मसुख मिळवा (क्र ६) सद्गुरूनी कृपा करून दिलेल्या नामाचे अखंड ध्यान व गान केल्याने मला राम पावला, हाच विश्राम अनेक जन्म मी रामाची आस केली, ते रूप मला नामस्मरणाने पहावयास मिळाले देवा, मी कसाही पापी असला तरी आता तुझी भक्ति मला दे म्हणजे पुरे (क्र ७) सर्व वेदशास्त्रें इतकेच सागतात की देवाला शरण जाऊन माया दूर करावी, मन शुद्ध करावे, कर्मे ब्रह्मार्पण करावी, व विरक्ति धरून भक्ति करावी सर्वत्र देव पहावा अशा वृत्तीने मन देवाला द्यावें, अहर्निशा अखंड नामस्मरण करावे (क्र ८), ऋद्धिसिद्धी तृष्णादि दासी आहेत अशा देवाला हृदयी धरावे, निर्विवृटली, ज्ञाना-जगात देव पहावा नामाचे स्मरण करावे अहकाराचा ठाव मान्य होऊन इहलोकी व परलोकीही धन्की, निवृत्ति झाली

साधकाने देवालाच सखा सोयरा मानून त्यालाच सुखदु:ख सांगावे, त्याच्यापाशीच भक्तिप्रेम मागावे याचे नाव अनन्यभक्ति श्रीसिद्धेश्वरमहाराज म्हणतात 'देवा, विचार करून पहा, मला तुझ्यावाचून सखासोयरा जिवलग कोण आहे? करुणासागरा, तुलाच मी माझें सुखदु:ख सांगेन तुला माझें चित्त अर्पण करून मी सुखी झालो (क्र १०) देवा फार काय सांगू? मी पतित पापी आहे, पण तू पतितपावन आहेस अशी तुझी कीर्ती आहे तू पापी, पशुपक्षीही मोक्षाला नेले आहेस तेव्हा, मला एका शरणागताला तार माझी सर्व चिंता तुला असू दे मला भक्तिज्ञान कर्म वगैरे काही कळत नाही मी एक तुझें नाम चिंतन करीत बसलो आहे (क्र ११) देवा, मी पतित, अन्यायी आहे, म्हणून शरण आलो असून, तुझ्या दारी उभा राहून तुला हाका मारीत आहे मला फार क्लेश झाले, म्हणून तुझ्या पायापाशी मी आलो तू माझें अंतर जाणतोस,

होणार नाही  वासनाचा क्षय करून, ज्ञानाज्ञानाच्या पलीकडे गेले पाहिजे, मन मारून, देहीच देहातीत होऊन, सर्वात्मभाव झाला पाहिजे  हेच सताचे लक्षण आहे (क्र १४)  येथें साधनविचार सपला, यापुढें साक्षात्कारविचार  उपलब्ध अभगात, साक्षात्काराच्या ज्योति, नाद वगैरे प्रकाराचे वर्णन नाही  दोह्यात त्याचा दोनदा उल्लेख आहे  परतु अभगात साक्षात्काराने प्राप्त होणाऱ्या अवस्थेचे, त्याच्या मानसिक व बौद्धिक परिणामाचे फार उदात्त व गभीर वर्णन केलेले सापडते, व परमार्थाच्या दृष्टीने ते फार महत्त्वाचे व उद्बोधक आहे  त्यावरून श्रीसिद्धेश्वरमहाराज परमार्थाच्या किती उच्च पदाला पोहोचले होते याची कल्पना येईल  ते आत्मानुभूतीबद्दल म्हणततात —सज्जनाचे रामावर फार प्रेम  ते प्रमाने अखड नामस्मरण करतात, त्यामुळें त्याना सदा समाधान असते, सर्वत्र राम भरलेला दिसतो, दृश्याभास दिसतच नाही  देहात असतानाच ते देहातीत होऊन रामरूपात राहून, सदा शात असतात  त्याना सर्वत्र एकातच असतो (क्र १५)

"रामाच्या ठिकाणी दृढ प्रेम जडल्यामुळें माझ्या देहात देव प्रकट झाला  त्या आनदाने मी देवाशी एकरूप झालो  ते शुद्ध रूप पाहून स्मृति, देह व भूगोलही मावळला.  जीवदशा माग राहिली, मग आशावाछा कोठे उरणार ?  क्षुधातृष्णादि देहधर्म देखील मावळले  वाचा व मनाची धाव खुटली, ज्ञानासकट बुद्धि आत्मस्वरूपात मुरली  चित्तअहकाराचा ठाव पुसला  आनदाच्याही पलीकडे वृत्ति गेली,  निवृत्ति झाली

मागणे आहे सदैव तुझें अखड ध्यान, व बोधसुधेचे पान ही ज्ञानोत्तर भक्ति मला दे (क्र २५) आता ब्रह्माडच मला पढरी झाली, विठ्ठल चराचरी भरलेला दिसतो मुमुक्षूना आईप्रमाणे असणारी सद्वृत्ति ही रखुमाई, तुर्या ही चद्रभागा व उन्मनी ही भीमा चिन्मय वाळवटात बोधरूपी पुडलीक आहे, तेथें निर्विकार सत रामकृष्णहरी हे नाम गातात देहातीत होऊन पाहिल्यावर या सिद्धेश्वराला अशा प्रकारचे विठ्ठलदर्शन होते (क्र २६) देवाचे ध्यान केल्यामुळें सव काही वासुदवमय ब्रह्ममय झाले याचेच नाव आत्मनिवेदन, ध्यान केल्याने अस आत्मनिवेदन होते (क्र २७) आता मी नव्याच प्रकाराने देवाची पूजा करतो देहाचे देऊळ करून त्यात गोपाळाची स्थापना केली आहे त्याला पृथ्वीचे चदन लावून, शब्दाची फुले वाहिली प्राणाचा धूप दाखवून, प्रत्यग् ज्योतीनी ओवाळिले सर्वसुखाचा नैवेद्य करून सर्वात्मत्वाचा ताबूल दिला अशी साग पूजा केली, पण मी पूजक मात्र देवापासून भिन्न नव्हतो हीच माझी परा पूजा (क्र २८) अशी परापूजा झाल्यावर जीवनाची सार्थकता झाली, काही कर्तव्य उरले नाही परतु सर्व साक्षात्कारी सताना विश्वाचे कल्याण व मगल करणारी भक्ति वाढावी, भक्तीची व भक्ताची परपरा अखड चालावी अशी उलट इच्छा असते व ते स्वत भक्ति वाढविण्याचे एकच कार्य करीत राहतात ती भावना शवटच्या दोन अभगात श्रीसिद्धेश्वरमहाराजानी व्यक्त केली आहे 'भक्त,

विरक्त, मुमुक्षु जनाना सदा समाधान असो त्याचे उत्सव, महोत्सव वगैरे वासुदेवाच्या कृपेने निर्विघ्नपणे चालोत त्याना सुखाचा सुकाळ असावा, दु खाचा दुकाळ व्हावा अमगल कल्पना त्याना शिवू नये नारायणाच्या सर्व भक्ताचे कल्याण असो (क्र २९)" नामदेवाच्या "आकल्प आयुष्य व्हावे तया कुळा" या अभगाची वाचकाना येथे सहजच आठवण होईल "शिष्याजवळ येवढेच मागावयाचे आहे त्यानी सदा हृदयात रामाला दृढ धरावे विषयी विरक्त होऊन सताच्या पायी आसक्त व्हावे, स्वत नवविधा भक्ति करून जनाला ही त्याच मार्गाला लावावे स्वत निर्विकार होऊन सर्वांची अत करणे निववावी अशी सर्वंगत ईश्वराची सेवा करणे हेच सिद्धेश्वराचे व्रत आहे , तेच शिष्यानी चालवावे" (क्र ३०)

## दोहे.

---

अभगानतर आता दोह्याचा विचार दोहे दहाच आहेत परतु उच्च प्रतीचे आहेत जीविताची सार्थकता कशात आहे, खऱ्या देवाचे स्वरूप काय, त्याच्या प्राप्तीचा मार्ग कोणता व साक्षात्काराचे स्वरूप काय हे सर्व विचार त्यात थोडक्यात आले आहेत "जोगी जगमापेक्षा थोर लोक, मीर अमीर सर्व ( भवसागरात ) बुडून मेले जे कोणी सताचे लाडके होत तेच त्याच्या कृपेने पार गेले ( क्र १ ) वेद पढून त्यातील वर्म ज्याना कळत नाही, योग करतात पण भोग ज्याना सुटत

नाही शद्बज्ञान जाणतात पण ध्यान ज्याना करता येत नाही, ते सर्व दुःखाचे वाटेकरी होत ( क्र २ ) जेथें गगा यमुना नाहीत जेथें नदी व तीर असा भेद नाही अशा अज निर्गुण आत्मस्वरूपाचे दर्शन घे ( क्र ३ ) वेद पढणारे पडित खुशाल शास्त्र सागत बसू देत पण जोपर्यंत सद्‌गुरूची गाठ पडली नाही तोपर्यंत दु खच राहील आत्मप्राप्तीचे सुख मिळणार नाही ( क्र ४ ) देहभाव दूर कर, हरीचे ध्यान करण्याकडे चित्त दे मग तुझा आत्मा ईश्वराच्या महदाकाशात सहजच लीन होऊन जाईल (क्र ५) असे साधन करताना पाचीं इद्रियें हातात घे, मनात धीर राख (खुदा मिला है सबूरी मे) मग, तो रघुवीर पतितपावन, दीनदयाल, करुणाघन आहे, तो कृपा करीलच (क्र ६) ससाररूपी निबिड वनाची गुतागुत फार कठीण आहे, तेथें नीट न्याहाळून पावले टाक झगमगणारी आत्मज्योत उजळून, तिच्या प्रकाशाने अज व अविकार देवाला पहा (क्र ७) देह रणमैदानात खडा आहे, अनाहताची नौबत झडत आहे, झगमग ज्योत पाजळली आहे, अशा रीतीने विरळाच कोणी शूर पुरुष जीवन्मुक्ति मिळवून भवपार होतो (क्र ८) जो डोळ्यावाचून पाहतो, रसनेवाचून रस चाखतो, व चित्त व मन यावाचून ध्यान करतो तोच साधु मला आवडतो (क्र ९) जेथें काया, माया, जग नाही, आकाश व पवन नाही अशा ठिकाणी मठ बाधून विदेही व देहातीत असा मी सदा वास करतो (क्र १०) हीच परमार्थाची पराकोटी

---